**औरंगाबाद विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये निवडीने नियुक्त्या.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
आदेश क्र.: मविसे १०/२०१०/प्र.क्र.१३४/आस्था-३अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २४ ऑक्टोबर,२०११.

**आदेश :-**

औरंगाबाद विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील खालील कर्मचा-यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+४४०० ग्रेडवेतन या वेतनश्रेणीत प्रशासकीय निकड म्हणून प्रतिनियुक्तीमुळे रिक्त आणि सरळसेवेच्या कोटयाच्या रिक्त पदावर तदर्थ स्वरुपात (Adhoc) निवडीने नियुक्ती देण्यात येत आहे. निवडीने नियुक्तीनंतर त्यांची नेमणूक पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ.क्र | नाव | सद्याचे पद | निवडीने नियुक्तीनंतरचे पद व ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. आर. व्ही. कड | विस्तार अधिकारी (पंचायत), जि.प. जालना | गट विकास अधिकारी (प्रशासन), विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद |
| २ | श्री. जी.डी. वाडेकर | विस्तार अधिकारी (पंचायत), जि.प. जालना | गट विकास अधिकारी (रोहयो), जिल्हा परिषद जालना |
| ३ | श्री. एम. जी. जाधव | विस्तार अधिकारी (पंचायत), जि.प. औरंगाबाद | बाल विकास प्रकल्प अधिकारी, जाफराबाद, जि. जालना |
| ४ | श्री. व्ही. के. जगताप | विस्तार अधिकारी (पंचायत), जि.प. बीड | सहायक प्रकल्प अधिकारी (संनियंत्रण), जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, बीड |
| ५ | श्री. ए. एस. कदम | विस्तार अधिकारी (पंचायत), जि.प. नांदेड | बाल विकास प्रकल्प अधिकारी, जळकोट, जि.लातूर |
| ६ | श्री. पी. जी. जोंधळे | कृषी अधिकारी, जि.प. नांदेड | बाल विकास प्रकल्प अधिकारी, कळमनूरी, जि. हिंगोली |
| ७ | श्री. एस. जी. कोंडेकर | कक्ष अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड | बाल विकास प्रकल्प अधिकारी, किनवट जि.नांदेड |
| ८ | श्री. व्ही. पी. संभारे | कक्ष अधिकारी, जिल्हा परिषद, जालना | बाल विकास प्रकल्प अधिकारी, बदनापूर, जि. जालना |

२.	वरील कर्मचा-यांना देण्यात आलेली निवडीने नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) सदर कर्मचा-यांची नियुक्ती ही ११ महिन्यांसाठी अथवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेचे उमेदवार उपलब्ध होईपर्यंत किंवा प्रतिनियुक्तीवरील अधिकारी विभागात प्रत्यावर्तीत होईपर्यंत, या पैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत चालू राहिल.

ब ) सदर पदोन्नती ही संबंधित अधिका-यांनी महाराष्ट्र विकास सेवा विभागीय परिक्षा नियम १९९१ व सुधारणा नियम १९९८ मधील तरतूदी नुसार विहीत मुदतीत परिक्षा उत्तीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे. अन्यथा ते पदावनतीस पात्र ठरतील.

क ) सदर पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही १०८७ /२००/ प्र.क्र.३ / ८७ / १२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

ड) सदर पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिका-यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

इ) सदर पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्रमांक ८४५२ / २००४ मध्ये होणा-या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

ई) सदर पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३.	निवडीने नियुक्त झालेल्या पदोन्नत कर्मचा-यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून , शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/ प्र.क्र.११ /८९ / १२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या केलेल्या निवडीने नियुक्त्या रद्द करण्यात येतील.

४.	संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी निवडीने नियुक्त झालेल्या कर्मचा-यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन , तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित कर्मचा-यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५.	निवडीने नियुक्त्या दिलेल्या पदोन्नत कर्मचा-यांनी त्यांच्या नविन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८ /११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६.	सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१११०२४१३१२०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने )
२. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, हिंगोली.
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद, औरंगाबाद, जालना, बीड, परभणी, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, हिंगोली.
६. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजन संचालनालय, नवी मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य- महाराष्ट्र- २ नागपूर .
८. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
९. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री,( ग्राम विकास )
१०. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
११ संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२ / योजना -५ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३अ ग्राम विकास व जलसंधारण विभाग